लातूर शहर महानगरपालिकेमध्ये मानधन तत्वावर कार्यरत असलेले डॉ.महेश शंकरराव पाटील यांचे महानगरपालिकेतील वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय व राज्य कार्यक्रम व्यतिरिक्त/जन्म-मृत्यू व विवाह नोंदणीसह) या मंजूर व रिक्त पदावर महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगरविकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: लामपा-२०२३/ प्र.क्र.८५/ नवि-२४**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक-: ०८ जुलै, २०२४

**वाचा :-** १) लातूर शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र.६४, दि.२३.९.२०१५
२) महाराष्ट्र शासन राजपत्र, नगर विकास विभाग, असाधारण क्र.२९०, दि.२.१२.२०२०
३) आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका यांचे जा.क्र./लामनपाला/सामान्य प्रशासन विभाग/१०३४/२०२४, दि.१२.०२.२०२४
४) आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका यांचे जा.क्र./लामनपाला/सामान्य प्रशासन विभाग/१३८९/२०२४, दि.१३.०२.२०२४

**प्रस्तावना: -**

डॉ. महेश पाटील यांना तत्कालीन नगरपरिषद लातूर मध्ये मानसेवी आरोग्याधिकारी या पदावर विहित पध्दतीने वर्तमानपत्रात जाहीरात देऊन, लेखी परिक्षा, निवड समिती मार्फत मुलाखती द्वारे निवड करून दि.९.०७.२००४ रोजीच्या आदेशान्वये कंत्राटी पद्धतीने मानधन तत्वावर नियुक्ती देण्यात आलेली होती. डॉ. पाटील हे तत्कालीन नगरपरिषद, लातूर पासून सद्यस्थितीमध्ये लातूर शहर महानगरपालिकेतील या (मानधन) आरोग्याधिकारी तथा निवासी वैद्यकीय अधिकारी पदावर गेल्या १९ वर्षापासून आरोग्य विभागात मानधनावर कार्यरत आहेत. लातूर शहर महानगरपालिकेने त्यांना तांत्रिक खंड देवून वेळोवेळी मानधन तत्वावरील नियुक्तीस मुदतवाढ दिलेली आहे.

२. लातूर शहर महानगरपालिकेत आरोग्य विभागात मानधन तत्वावर कार्यरत असलेले डॉ. महेश पाटील यांची मूळ नियुक्ती तत्कालीन नगर परिषद लातूर मध्ये विहित पद्धतीने वर्तमानपत्रात जाहीरात, लेखी परिक्षा देऊन, निवड समिती मार्फत मुलाखती द्वारे निवड करून मानसेवी आरोग्याधिकारी पदावर कंत्राटी पद्धतीने मानधन तत्वावर करण्यात आली आहे. तसेच लातूर शहर महानगरपालिकेच्या वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय व राज्य कार्यक्रम व्यतिरिक्त/जन्म-मृत्यू व विवाह नोंदणीसह) या पदासाठी विहीत केलेली शैक्षणिक अर्हता पूर्ण करीत आहे. डॉ. पाटील, (मानधन) आरोग्याधिकारी तथा निवासी वैद्यकीय अधिकारी यांना अंतर्गत भरती/अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर

योनजेअंतर्गत लातूर महानगरपालिकेतील वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय व राज्य कार्यक्रम व्यतिरिक्त/जन्म-मृत्यू व विवाह नोंदणीसह) या मंजूर व रिक्त पदावर सामावून घेण्यास लातूर शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र.६४ दि.२३.९.२०१५ अन्वये मान्यता देण्यात आली. त्यानुसार मा.सर्वसाधारण सभा ठराव क्र.६४, दि.२३.९.२०१५ अन्वये दिलेली मान्यतेस अधिन राहून पत्रान्वये डॉ. महेश पाटील यांचे लातूर महानगरपालिकेतील वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय व राज्य कार्यक्रम व्यतिरिक्त/जन्म-मृत्यू व विवाह नोंदणीसह) मंजूर व रिक्त पदावर सामावून घेण्याचा प्रस्ताव आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका यांनी संदर्भ क्र.३ व ४ येथील पत्रान्वये शासनास सादर केला होता.

३. त्यानुसार, डॉ.महेश पाटील यांचे लातूर शहर महानगरपालिकेतील वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय व राज्य कार्यक्रम व्यतिरिक्त/जन्म-मृत्यू व विवाह नोंदणीसह) मंजूर व रिक्त असलेल्या पदावर नियमित समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका यांनी संदर्भ क्र.३ व ४ येथील प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे लातूर शहर महानगरपालिकेतील (मानधन) आरोग्याधिकारी तथा निवासी वैद्यकीय अधिकारी या पदावर मानधन तत्वावर कार्यरत असलेले डॉ. महेश पाटील यांची मूळ नियुक्ती कंत्राटी पध्दतीने मानधनावर विहित पध्दतीने (जाहिरात/लेखी परीक्षा/मुलाखत) नियुक्ती झालेली आहे. तसेच डॉ.महेश पाटील हे लातूर शहर महानगरपालिकेतील वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय व राज्य कार्यक्रम व्यतिरिक्त/जन्म-मृत्यू व विवाह नोंदणीसह) या मंजूर पदासाठी विहीत केलेली शैक्षणिक अर्हता पूर्ण करीत आहेत.

२. आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका यांनी संदर्भ क्र.३ व ४ येथील प्रस्ताव विचारात घेवून डॉ. महेश पाटील यांची लातूर शहर महानगपालिकेतील वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय व राज्य कार्यक्रम व्यतिरिक्त/जन्म-मृत्यू व विवाह नोंदणीसह) या मंजूर व रिक्त पदावर नियमित समावेशन करण्यास खालीली अटी व शर्तींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

***अटी व शर्ती :-***

१. डॉ. महेश पाटील यांचे लातूर शहर महानगरपालिकेतील वैद्यकीय अधिकारी (राष्ट्रीय व राज्य कार्यक्रम व्यतिरिक्त/जन्म-मृत्यू व विवाह नोंदणीसह) या रिक्त पदावर शासन निर्णयाच्या दिनांकापासून महानगरपालिकेच्या सेवेत समावेशन करण्यात यावे.
२. डॉ. पाटील यांची नियमित सेवा सर्व प्रयोजनार्थ त्यांच्या समावेशनाच्या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी.
३. नियमित सेवेच्या दिनांकापासून त्यांना सेवा जेष्ठता, निवृत्ती वेतन इ. चे लाभ अनुज्ञेय राहतील.

४. समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवाकालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तीय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

५. महानगरपालिकेने समावेशनाचे आदेश काढण्यापूर्वी संबंधित अधिका-याकडून बंधपत्र घ्यावे, ज्यामध्ये समावेशनाच्या दिनांकाच्या मागील कालावधीचे नियमित सेवाविषयक कोणतेही लाभ मिळणार नाही, तसेच भविष्यात याबाबत मागणी करता येणार नाही, याचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. सदर बंधपत्र संबधिताने महानगरपालिकेने मागणी केल्यानंतर एक महीन्याच्या आत महानगरपालिकेस सादर करावे लागेल, अन्यथा या शासन निर्णयान्वये संबंधित कर्मचा-याचे करण्यात येणारे समावेशन रद्द समजण्यात येईल.

६. सदर कर्मचाऱ्याच्या समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

७. डॉ.महेश पाटील यांचे लातूर महानगरपालिकेतील वैद्यकीय अधिकारी या पदावर समावेशन करताना, महानगरपालिकेचा आस्थापना खर्च ३५% पेक्षा जास्त होत असल्याने, ३५% आस्थापना खर्चाची अट सदर प्रकरणी शिथील करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०७०८१५३४५०४२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JAYANT VASANT WANI

Digitally signed by JAYANT VASANT WANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed8411d02826988b56bb8a80c92781268bc4b9d63f894022804b55bd1cea9847, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BFF25E350EA9446CC7F3B43987F8FFE247E43E10915A7723E889FCC11E2F43EB, cn=JAYANT VASANT WANI
Date: 2024.07.08 15:45:48 +05'30'

**( जयंत वाणी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
२. प्रशासक तथा आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका, लातूर
३. मा.प्रधान सचिव (नवि-२) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव (नवि-२४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. निवडनस्ती (नवि-२४)